**वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठी निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक : तांसुयो-२०२४/प्र.क्र.४२८/योजना-१**
नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०२४.

संदर्भ:- शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक-तांसुयो-२०२४/प्र.क्र.१९७/ योजना-१,दि.०५ मार्च, २०२४.

ज्ञापन:-

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत सन २०२३-२४ मध्ये संदर्भाधिन दिनांक ०५.०३.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये छ.संभाजीनगर जिल्ह्यातील रु.३.०० कोटी रक्कमेच्या २४ कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली असून त्यांकरीता रु.१.५० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे सदरहू २४ कामांसाठीचा उर्वरित रु.१.५० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

(रु. लक्ष मध्ये)

| अ.क्र. | आर्थिक वर्ष | जिल्हा | नस्ती क्रमांक | शासन निर्णयाचा दिनांक | कामांची संख्या | मंजूर निधी | वितरीत केलेला निधी | याद्वारे वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) |
| १. | २०२३-२४ | छ.संभाजी नगर | तांसुयो-२०२४/ प्र.क्र.१९७/यो-१ | ०५.०३.२०२४ | २४ | ३००.०० | १५०.०० | १५०.०० |
| | | | | **एकूण** | **२४** | **३००.००** | **१५०.००** | **१५०.००** |

२. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण यांनी याद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी फक्त उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांसाठीच उपलब्ध करुन द्यावा. सदरहू आदेशामध्ये नमूद कामे वगळता परस्पर अन्य कामांसाठी निधी वळता केल्याचे निदर्शनास आल्यास ती आर्थिक अनियमितता आहे असे समजून आपणांविरुद्ध नियमानुसार कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घ्यावी. तसेच कामांसाठी निधी उपलब्ध करुन देतांना संदर्भाधिन शासन निर्णयातील अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याची खातरजमा करावी.

३. सदरहू निधी वितरीत करण्यासाठी उप सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” तसेच सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, छ.संभाजीनगर यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, सदरहू निधी कोषागारातून आहरित करण्यासाठी संबंधित सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, छ.संभाजीनगर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. याबाबतचा खर्च “मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)” या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष २०२४-२५ करीता प्राप्त आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदरहू ज्ञापन वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक ६५८/२०२४/ व्यय-१४, दिनांक ०३.०७.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२४०८०५१४४०५१६५३४ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH ROHIDAS CHAVAN

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=c0edee7a8805e86e41846cf28cf151b9ce48bb88ebf4f2e8a7fc10e8dcad98ec, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C2377ED235498603821D49922A210871FF6FB9B369722AC707AEE7DCD87F2BD, cn=DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2024.08.05 14:55:12 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना जिल्हास्तरीय समिती, छ.संभाजीनगर.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, छ.संभाजीनगर.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, छ.संभाजीनगर.
५. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
६. सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, छ.संभाजीनगर.
७. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, छ.संभाजीनगर.
८. गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गंगापूर, जि.छ.संभाजीनगर.

९. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, छ.संभाजीनगर.
११. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (योजना-१).